**राज्यात राबविण्यात येत असलेल्या गांवठाण जमाबंदी प्रकल्पाअंतर्गत (स्वामित्व योजना) गावठाणातील मिळकतींचे भूमापन करून तयार झालेल्या सनदेची वसुल झालेली फी/रक्कम जमा करण्यास बँक ऑफ बडोदा मध्ये जमा खाते उघडण्यास शासन मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राभूअ-२०१९/प्र.क्र.१६०/ल-१**
पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक : २४ जानेवारी , २०२२

**वाचा:-**

१) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१८/प्र.क्र.१३/मातंक, दि.२२.०२.२०१९.
२) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.गांवठाण/सनद फी वसुली/प्र.क्र. ७/२०२१, दि.७.४.२०२१ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधिन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये राज्यामध्ये गांवठाण जमाबंदी प्रकल्पाची (स्वामित्व योजना) अंमलबजावणी करण्यात येत आहे. राज्यात राबविण्यात येत असलेल्या गांवठाण जमाबंदी प्रकल्पाअंतर्गत (स्वामित्व योजना) गावठाणातील मिळकतींचे भूमापन करून तयार झालेल्या सनदेची वसुल झालेली फी/रक्कम जमा करण्यास जमा खाते उघडण्यास शासन मान्यता देण्याबाबत जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख , पुणे यांनी संदर्भाधिन वाचा क्र. २ अन्वये प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुषंगाने गांवठाण जमाबंदी प्रकल्पाअंतर्गत गावठाणातील मिळकतींचे भूमापन करून तयार झालेल्या सनदेची वसुली झालेली फी/रक्कम जमा करण्यास व्हर्चुअल अकौंट (VAN) सह बँक ऑफ बडोदा मध्ये जमा खाते (DEPOSITORY ACCOUNT) उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

राज्यात राबविण्यात येत असलेल्या गांवठाण जमाबंदी प्रकल्पाअंतर्गत गावठाणातील मिळकतींचे भूमापन करून तयार झालेल्या सनदेची वसुल झालेली फी/रक्कम व्हर्चुअल अकौंट (VAN) सह बँक ऑफ बडोदा मध्ये जमा खाते (DEPOSITORY ACCOUNT) उघडण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

(I) सदर बँक खात्यांतील व्यवहारांचे मासिक/तिमाही ताळमेळ करणे तसेच लेखा परिक्षण करणे जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांच्यावर बंधनकारक राहील. तसेच, वेळोवेळी शासनास त्याबाबतचा अहवाल सादर करण्याची जबाबदारीही जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, पुणे यांची राहील.

(II) सदर बँक खात्यामध्ये जमा होणारी रक्कम ही T+१ या कालावधीत जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भुमी अभिलेख, पुणे यांचे कार्यालयातील PLA खात्यामध्ये जमा करण्यात यावी.

(III) त्याचबरोबर संदर्भाधिन क्र. १ मधील तरतुदीनुसार स्विय प्रपंजी खात्यामधील वित्तीय मर्यादेपेक्षा अधिकची रक्कम ही T+१ या कालावधीमध्ये शासनाच्या एकत्रित निधीमध्ये जमा करण्यात यावी.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २३३/२१/कोष-प्रशा-५, दिनांक ९.१२.२०२१ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२४१४४५४३०११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHAGWAN MARUTI SAWANT

Digitally signed by BHAGWAN MARUTI SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8ee89eb0aec64f8bc0bdf8d85ddb4706d35abd8b73c618e114ee98d5c9ecf57b, pseudonym=6A69B309A6281D99F5A420A268723ECE6A8B4A60, serialNumber=C7DBA1C6B5F7AB2A6CABC4F7EAD8CFA74F8F7A0FADCAC76D8F1CF22569F16BD3, cn=BHAGWAN MARUTI SAWANT
Date: 2022.01.24 14:48:36 +05'30'

(भगवान सावंत)

अवर सचिव

प्रत:-

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.मंत्री (महसूल) /मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
४. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
५. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
६. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव.
७. मा. अपर मुख्य सचिव (वित्त) .
८. मा. प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान).
९. सर्व विभागीय आयुक्त.
१०. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे
११. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२. सर्व जिल्हाधिकारी
१३. महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र १ व २, मुंबई / नागपूर
१४. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १ व २, मुंबई / नागपूर
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१६. माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१८. निवड नस्ती (ल-१).